झेरॉक्स मशीन्स खरेदी करण्यास
शासनाची मंजूरी मिळणेबाबत....

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.एमअेजे - ०७९५/१८७८/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक १८ जून, २००१.

पहा:- १)कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.डीएसए-५०९१/क-३ दिनांक २०.०१.१९९५ चे पत्र
२)कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.डीएसए-५०९३/क-३ दिनांक २३.०७.१९९९ चे पत्र
३)कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.डीएसए/झेरॉक्स मशीन/ ५०९३/क-३दिनांक २३.०७.१९९९ चे पत्र.

शासन निर्णय

राज्यातील कारागृह महानिरीक्षक यांच्या अधिपत्याखाली चार कारागृह उपमहानिरीक्षक यांची कार्यालये व ८ मध्यवर्ती कारागृहे येथील बंद्याची प्रकरणे, न्यायालयीन प्रकरणे, आस्थापनेतील कर्मचाऱ्यांची विविध प्रकरणे सतत चालू असतात. यामधील प्रत्येक प्रकरणांमध्ये आवश्यक असणाऱ्या छांयाकित प्रती बाहेरच्या दुकानातून काढाव्या लागतात. सदर कामाकरिता दररोज खूप खर्च करावा लागतो. जर छायांकित प्रती काढण्याच्या झेरॉक्स मशिन्स वरील ठिकाणी उपलब्ध करुन दिल्यास दररोज होणारा खर्च टाळता येईल. तसेच गोपनीय कागदपत्रे बाहेर जाणार नाहीत त्यामुळे प्रशासनास मदत होईल व शासकीय खर्चात बचत होईल याकरिता मे.किलबर्न रिप्रोगाफिक्स लि. या संस्थेची बारा झेरॉक्स मशीन खरेदी करण्याकरिता प्रशासकीय मान्यता मिळावी अशी विनंती कारागृह महानिरीक्षक यांनी वरील पत्रान्वये केली होती.

२. याबाबत कारागृह महानिरीक्षक यांची विनंती शासनाच्या विचाराधीन होती. आता शासनाने १२ झेरॉक्स मशीन पैकी येरवडा मध्यवर्ती कारागृह व मुंबई मध्यवर्ती कारागृह याकरिता प्रत्येकी एक याप्रमाणे दोन झेरॉक्स मशीन खरेदी करण्यास मान्यता दिलेली आहे.

३. याकरिता येणाऱ्या अंदाजे खर्च रु.१ लक्ष ६० हजार इतक्या खर्चास चालू वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यास शासन या आदेशाव्दारे मान्यता देत आहे. तसेच सदरची खरेदी दर करारातील ज्या कंपनीचे दर कमी असतील त्या कंपनीकडून प्रचलित पध्दतीने खरेदी करण्यात यावी. या करिता येणारा खर्च लेखाशिर्ष "२०५६ तुरुंग (योजनेतर)-१०१-तुरुंग-१०१(१) मध्यवर्ती तुरुंग-५-कार्यालयीन खर्च (२०५६००४४०५)" याखाली खर्च टाकण्यात यावा. सन २००१-२००२ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वरील शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर ३५४/२००१/व्यय-८, दिनांक ११.०४.२००१ च्या व लेखा व कोषागारे यांच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

गुजकुलकर्णी

(गु.ज.कुलकर्णी)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक दक्षिण विभाग, मुंबई.
कारागृह उपमहानिरीक्षक पश्चिम विभाग, पुणे.
अधीक्षक, मुंबई मध्यवर्ती कारागृह, मुंबई
अधीक्षक, येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र (१) (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र (१) (लेखापरीक्षा), मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
वित्त विभाग, (व्यय - ८) मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (लेखा व कोषागरे) मुंबई.
अवर सचिव, (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती पीआरएस-२